आदिवासी विकास विभागास विविध अभियांत्रिकी महाविद्यालये, व्यवस्थापन संस्था, अग्रगण्य शैक्षणिक संस्था / विद्यापीठे यांचेकडुन उपलब्ध करुन देण्यात आलेल्या आंतरवासिता छात्रांच्या निवडीबाबत अटी व शर्ती...

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आविवि ०३१७/प्र.क्र.९०/का.१६

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय,मुंबई-३२
तारीख: ०७ जूलै २०१७

प्रस्तावना -

आदिवासी विकास विभागामार्फत आदिवासींच्या विकासासाठी विविध योजना राबविण्यात येतात. सद्यस्थितीत विभागाच्या कामकाजामध्ये व उत्तरदायीत्वामध्ये मोठया प्रमाणात वाढ झालेली आहे. यामध्ये आदिवासी जमाती व आदिवासी क्षेत्रांच्या विकासासाठी शासनाच्या विविध योजनांचे नियोजन, आर्थिक बाबी, समन्वय, नियंत्रण इत्यादी बाबींचा समावेश होतो. राज्याच्या आर्थिक नियोजनातील हिस्सा तसेच आदिवासींना द्यावयाच्या संरक्षणाबाबतचे दायित्व या दृष्टीकोनातून शासनाचे धोरण ज्या हेतूने तयार झालेले आहे तो हेतू साध्य करण्याकरीता आदिवासी विकास विभाग महत्वाची भूमिका पार पाडत आहे. यामध्ये राज्यातील उद्योगांकडूनसुध्दा सामाजिक उत्तरदायीत्व अंतर्गत (CSR) त्यांचा सहभाग घेण्याचा प्रयत्न विभागाद्वारे करण्यात येत आहे. त्याअंतर्गत विविध उद्योगांसमवेत करार करुन आश्रमशाळा, वसतीगृहांमध्ये विविध सुविधा प्रभावीपणे राबविण्यासाठी उपाययोजना करण्यात येत आहेत.

आदिवासींशी संबंधित विविध ध्येयधोरणांचे मूल्यमापन करणे, सदर योजनांचा अभ्यास करणे, नवीन धोरण ठरविणे इ.साठी अभियांत्रिकी महाविद्यालये, व्यवस्थापन संस्था, अग्रगण्य शैक्षणिक संस्था / विद्यापीठे व्यावसायिक तज्ञ यांचे सहकार्य आदिवासी विकास विभागामार्फत घेण्यात येते. या अतंर्गत अशा संस्थाबरोबर आदिवासी विकास विभागाने करार देखिल केलेले आहेत. त्यानुषंगाने सदर संस्थाकडुन आंतरवासिता उमेदवार ( इंटरशिपद्वारे ) उपलब्ध करुन देण्यात येतात, तसेच विभागाकडून देखिल आंतरवासिता उमेदवार (इंटरशिपद्वारे) उपलब्ध करुन देणेबाबत सदर संस्थाकडे विनंती केली जाते. सदर आंतरवासिता उमेदवारांचा कालावधी हा १ ते ६ महिने इतका असून तो कालावधी ११ महिने किंवा त्यापेक्षा वाढविता येईल. त्या अनुषंगाने या आंतरवासिता उमेदवारांना छात्रवृत्ती व इतर अटी विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -**

आदिवासींशी संबंधित विविध ध्येयधोरणांचे मूल्यमापन करणे, सदर योजनांचा अभ्यास करणे, नवीन धोरण ठरविणे इ.साठी अभियांत्रिकी महाविद्यालये, व्यवस्थापन संस्था, अग्रगण्य शैक्षणिक संस्था / विद्यापीठे यांचे सहकार्य आदिवासी विकास विभागामार्फत घेण्यात येते. त्यानुषंगाने सदर संस्थाकडून आंतरवासिता उमेदवारांसाठी ( इंटरशिपद्वारे ) छात्रवृत्ती देण्यास मान्यता देण्यात येत आहे. आदिवासी विकास विभागासाठी सदर आंतरवासिता उमेदवारांचा कालावधी हा १ ते ६ महिने राहील. विभागाच्या

आवश्यकतेप्रमाणे सदर कालावधी ११ महिने किंवा त्यापेक्षा अधिक वाढविता येईल. या आंतरवासिता उमेदवारांना पुढीलप्रमाणे छात्रवृत्ती व इतर अटी विहित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**आंतरवासिता छात्रांच्या निवडीसंबंधातील निकष -:**

अ) शैक्षणिक अर्हता :- कोणत्याही शाखेतील पदवी किंवा पदव्युत्तर पदवी ( किमान ६० % गुण आवश्यक) याशिवाय अधिक उच्च शिक्षणास प्राधान्य

ब) अनुभव :- नामांकित शिक्षण संस्थातील विद्यार्थ्यांसाठी अनुभवाची अट राहणार नाही. तथापि उद्योग व सार्वजनिक उपक्रम संस्थेतील उमेदवारांना किमान एक वर्षाचा अनुभव आवश्यक राहील.

क) वयोमर्यादा:- ज्यांचे वय किमान २१ वर्ष आहे.

ड) निवडीसंदर्भातील कार्यवाही व कालावधी :- आंतरवासिता छात्रांच्या निवडीबाबतची कार्यवाही संबंधित नामांकित संस्था / संबंधित विद्यापीठामार्फत आदिवासी विकास विभागाच्या सहमतीने करण्यात येईल. आंतरवासिता छात्रांच्या कामकाजाचा कालावधी हा १ ते ६ महिने राहील. विभागाच्या आवश्यकतेप्रमाणे सदर कालावधी ११ महिने किंवा त्यापेक्षा अधिक वाढविता येईल.

२. कामाचे स्वरुप :

१) आदिवासी विकास विभागास धोरणात्मक संशोधन व प्रकल्प अंमलबजावणीसाठी सहाय करणे.

२) महत्वाच्या योजनांसाठी विश्लेषणात्मक माहितीची भर टाकणे.

३) आदिवासी विकास विभागामार्फत केल्या जाणाऱ्या विविध प्रकल्पाच्या मुल्यमापनास सहाय करणे.

४) आदिवासी विकासविभागामार्फत राबविल्या जाणाऱ्या आरोग्य, पोषण, शिक्षण इत्यादी धोरणांच्या माहितीचे विश्लेषण.

५) विविध योजनांच्या नियमित माहितीचे संकलन, दस्तऐवजीकरण व अहवाल लेखन.

६) कार्यालयीन कार्यक्रमांच्या अनुषंगाने प्रसार माध्यमे व त्यांचे प्रतिनिधी यांच्याशी समन्वय ठेवणे.

७) आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक गुणवत्तेबाबत मुल्यमापन करणे. उपरोक्त कामांव्यतिरिक्त मा. सचिव (आ.वि.) यांनी दिलेली कामे करणे.

३. आंतरवासिता छात्रांना छात्रवृत्ती:- निवड करण्यात आलेल्या छात्रांना दरमहा खालीलप्रमाणे छात्रवृत्ती देण्यात येईल.

पदवीधारकांकरीता -

| अ.क्र. | कालावधी | छात्रवृत्ती प्रतिमहा |
|---|---|---|
| १ | ३ महिन्यांपेक्षा कमी | १५,००० |
| २ | ३-६ महिने | २०,००० |
| ३ | ६ महिन्यांपेक्षा अधिक | २५,००० |

पदव्युत्तर पदवीधारकांकरीता -

| अ.क्र. | कालावधी | छात्रवृत्ती प्रतिमहा |
|---|---|---|
| १ | ३ महिन्यांपर्यंत | २०,००० |
| २ | ३-६ महिन्यापर्यंत | २५,००० |
| ३ | ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधी | ३०,००० |

आंतरवासित छात्रांस दरमहा रु.३०००/- प्रवास भत्ता अनुज्ञेय राहील.

४. आदिवासी विकास विभागामध्ये सध्या कार्यरत आंतरवासितांना सदर शासन निर्णयानुसार छात्रवृत्ती ते ज्या दिनांकापासून रुजू झाले तेव्हापासून देय राहील. तसेच कार्यक्षेत्राबाहेर केलेल्या प्रवासासाठी व बैठकांकरीता आंतरवासिता छात्रांने केलेल्या प्रवासाची प्रतीपुर्ती करण्यात येईल. (सदर प्रवास रेल्वेसाठी द्वितीयवर्ग शयनयान स्वरुपाचा व बसकरीता निमआराम असावा. कामाची तातडी असल्यास मा.सचिव (आ.वि.) यांच्या मान्यतेने अन्य वर्गातून वा विमानप्रवास करता येईल.

५. सदर आंतरवासिता नेमणूकीच्या अंमलबजावणीसाठी वित्तीय तरतूद प्रतीवर्षी केंद्र शासनाच्या भारतीय संविधानच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत अनुदान व विशेष केंद्रीय सहाय्य योजने अंतर्गत मुल्यमापन व संनियंत्रण आणि संस्थात्मक बळकटीकरणासाठी प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावी. सदर छात्रवृत्ती संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेमार्फत करण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०७११२१२२२२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant Gopalrao Dhoke

Digitally signed by Laxmikant Gopalrao Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, cn=Laxmikant Gopalrao Dhoke
Date: 2017.07.07 11:20:20 +05'30'

(ल.गो.ढोके)
उपसचिव

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई .
२. मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई .
३. मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई .
४. मा.(सर्व )मंत्री / राज्यमंत्री /विरोधी पक्ष नेता यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक
५. सचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई.
६. आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक.
७. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.

८ व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक
९. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या., नाशिक
१०. सह सचिव / सर्व उपसचिव, आदिवासी विकास, मंत्रालय,मुंबई.
११. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास.
१२. वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.
१३. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई.
१५. सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय मुंबई.
१६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१७. निवड नस्ती (का.१६) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.